**जलसंपदा विभागातील मंत्रालय तसेच क्षेत्रीय स्तरावरील अधिकारी / कर्मचारी (अतांत्रिक) यांना वैयक्तिक आणि सांघिक पुरस्कार देण्याची योजना-**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : पुरस्कार (अतांत्रिक)-२०१४/(४/२०१४)/गोपनीय कार्यासन,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ८ मे, २०१७

संदर्भ:- १) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्रमांक : पुरस्कार(खुद्द)-१००३/४६/गोपनीय कार्यासन, दिनांक १९ डिसेंबर, २००३.
२) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक : पुरस्कार (अतांत्रिक)-२०१३/(५०/१३)/गो.का., दिनांक २१ मे, २०१२.

**प्रस्तावना:-**

जलसंपदा विभागातील मंत्रालय व क्षेत्रीय स्तरावरील वर्ग-१ ते वर्ग-३ मधील गुणवंत अतांत्रिक अधिकारी व कर्मचारी यांना त्यांनी केलेल्या कामकाजामध्ये त्यांची वैयक्तिक गुणवत्ता तसेच प्रशासकीय कौशल्य, याचा वापर करून कामात गतिमानता आणण्यासाठी केलेले प्रयत्न याबद्दल प्रतिवर्षी प्रोत्साहन देण्यासाठी प्रशस्तीपत्र देण्याबाबतचा संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक १९ डिसेंबर, २००३ निर्गमित करण्यात आला आहे. सदर दिनांक १९ डसेंबर, २००३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित केलेल्या योजनेचे पुनर्विलोकन करुन सदर योजनेतील काही बाबींमध्ये बदल करून संदर्भाधीन दिनांक २१ मे, २०१२ च्या शासन निर्णयान्वये सुधारित योजना कार्यान्वित करण्यात आली आहे. या योजनेमध्ये अंशत: बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय दिनांक २१ मे, २०१२ अन्वये विहित योजनेमध्ये अंशत: बदल करून पुरस्कार योजनेचा संपूर्ण तपशील सोबतच्या परिशिष्टात नमूद करण्यात आला आहे. त्यानुसार अतांत्रिक पुरस्कारासंदर्भात कार्यवाही करण्यात यावी.

वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च प्रशासकीय विभागास उपलब्ध होणाऱ्या "कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व विभागाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०८१५४५१२४८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.05.08 15:45:22 +05'30'

सहपत्र : परिशिष्ट

**( वि. का. चौधरी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) मा. मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव
५) मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
६) प्रधान सचिव (ज.सं.प्र. व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सर्व महासंचालक/कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
९) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१०) सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
११) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.
१२) सर्व तांत्रिक अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय (खुद्द), मुंबई
१३) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) गोपनीय कार्यासन (संग्रहार्थ)

## परिशिष्ट

शासन निर्णय, क्रमांक : पुरस्कार (अतांत्रिक)-२०१४/(४/२०१४)/गो.का., दिनांक ८ मे, २०१७ चे सहपत्र.

**विषय : जलसंपदा विभागातील मंत्रालय व क्षेत्रीय स्तरावरील गुणवंत अधिकारी / कर्मचारी (अतांत्रिक) यांना पुरस्कार देण्याबाबत....**

**अ) पुरस्काराचे स्वरूप :-**

पुरस्कार प्रशस्तीपत्र व सन्मानचिन्हाच्या स्वरूपात देण्यात यावा.

**ब) पात्र अधिकारी / कर्मचारी :-**

१) क्षेत्रीय कार्यालयातील अतांत्रिक संवर्गातील वर्ग-१ ते वर्ग-४ चे अधिकारी / कर्मचारी.

२) तांत्रिक संवर्गातील वर्ग-३ चे कर्मचारी (कनिष्ठ अभियंता वगळून) उदा. आरेखक, अनुरेखक इत्यादि.

३) मंत्रालय (खुद्द) येथील सह सचिव / उप सचिवांपासून वर्ग-४ पर्यंतचे अधिकारी / कर्मचारी (अतांत्रिक)

४) मंत्रालय (खुद्द) मधील सांघिक पुरस्कारासाठी कार्यासन.

**क) पुरस्कारांची संख्या :-**

| | | | |
|---|---|---|---|
| १) | प्रादेशिक विभाग | : | १० वैयक्तिक पुरस्कार |
| २) | मंत्रालय (खुद्द) | : | ५ वैयक्तिक पुरस्कार (गट अ-१, गट ब-२, गट क-१ व गट ड-१)<br>१ सांघिक पुरस्कार |

**ड) पुरस्काराचे निकष :-**

१) मागील ५ वर्षांच्या गोपनीय अहवालांची प्रतवारी अत्युत्कृष्ट असावी.
२) मंत्रालय (खुद्द) येथील वैयक्तिक पुरस्कारासाठी जलसंपदा विभागातील किमान ३ वर्षे सेवा असणे आवश्यक.
३) सचोटी व चारित्र्य उत्तम असावे, तसेच विभागीय चौकशी सुरू / प्रस्तावित नसावी.
४) वक्तशीरपणा व कामाचा निपटारा उत्तम असावा.
५) प्रशासकीय कौशल्य, कामामध्ये गतिमानता व नाविन्याची आवड असावी.
६) संगणकीकरणासाठी योगदान.
७) शासकीय खर्चात काटकसर / बचत व शासकीय उत्पन्न / महसूल वाढीसाठीचे योगदान.
८) शासनाची प्रतिमा उंचावण्यासाठी वैयक्तिकरित्या केलेले प्रयत्न / योगदान.
९) न्यायालयीन प्रकरणांची कार्यवाही.
१०) सर्वसामान्य जनता / लोकप्रतिनिधी यांच्याकडून येणाऱ्या मागण्या, विविध तक्रारी याबाबत वेळीच केलेली कार्यवाही व त्या कामात दाखविलेली कार्यतत्परता, कार्यक्षमता इत्यादि बाबी
११) नस्ती व्यवस्थापन व प्रकरण सुयोग्यरित्या सादर करण्याच्या प्रक्रियेमधील सहभाग.
१२) सामाजिक, आर्थिक व राज्याच्या दृष्टीने व्यापक विचार करून समाजाच्या हिताच्या दृष्टीने निर्णय घेण्यामध्ये दाखविलेली आवड व रुची.

१३) प्रकरण दर्जेदार पध्दतीने व नि:पक्षपातीपणे सादर करण्याची कार्यशैली व हातोटी.

१४) कार्यसंस्कृती (वर्क कल्चर) व कार्यनिती (वर्कइथिक) रुजविण्याचा व जोपासण्याचा केलेला प्रयत्न.

१५) सांघिक पुरस्कारासाठी कार्यालय / कार्यासनातील नीटनेटकेपणा व स्वच्छता, अभिलेखाचे निंदणीकरण, संदर्भ, प्रकरणे यांचा निपटारा, आश्वासने, कपात सूचना, पद भरती, बिंदू नामावली, निवडसूच्या, ज्येष्ठतासूच्या इत्यादि संदर्भात वेळेत केलेली कार्यवाही, कार्यासनाने सांघिकरित्या केलेली उत्तम कामगिरी.

**इ) पुरस्कार देण्यासाठी कार्यपध्दती :-**

(अ) जलसंपदा विभागातील क्षेत्रीय स्तरावरील कर्मचाऱ्यांच्या संदर्भात कार्यकारी संचालक / मुख्य अभियंत्यांनी त्यांच्या अंतर्गतच्या प्रत्येकी जास्तीत जास्त ३ अधिकारी / कर्मचाऱ्यांचे प्रस्ताव शासनास सादर करावेत.

(ब) जलसंपदा विभाग, मंत्रालय (खुद्द) येथील सर्व सह / उप सचिव यांनी त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यासनांच्या कामांचा आढावा घेऊन योग्य अशा फक्त एका कार्यासनाचा सांघिक पुरस्कारासाठी व वैयक्तिक पुरस्कारासाठी जास्तीत जास्त २ प्रस्ताव सादर करावेत.

(क) सह सचिव / उप सचिव (अतांत्रिक) पदावरील अधिकाऱ्यांच्या शिफारशी प्रधान सचिव / सचिव (जलसंपदा) तसेच प्रधान सचिव / सचिव (लाक्षेवि) यांच्याकडून मागविण्यात येतील.

**फ) पुरस्कारासाठीची निवड समिती :-**

१) प्रधान सचिव / सचिव (ज.सं.प्र.व विकास) } ज्येष्ठ सचिव हे समितीचे अध्यक्ष असतील व

२) प्रधान सचिव / सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि) } दुसरे सचिव हे सहअध्यक्ष असतील.

| | | |
|---|---|---|
| ३) महासंचालक, सं.प्र.ज.सं.व सुरक्षितता (मेरी), नाशिक | : | सदस्य |
| ४) कार्यकारी संचालक, म.कृ.खो.वि.म., पुणे | : | सदस्य |
| ५) मुख्य अभियंता (द.व प्र.) व सह सचिव | : | सदस्य |
| ६) सह सचिव (सेवा) / उप सचिव (सेवा) | : | सदस्य |
| ७) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती | : | सदस्य |
| ८) मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, ला.क्षे.वि., औरंगाबाद | : | सदस्य |
| ९) अवर सचिव (सेवा) | : | सदस्य सचिव |

सदर पुरस्कार देण्याबाबत उपरोक्त समितीचा निर्णय अंतिम राहील. पुरस्कार देण्याच्या निकषांमध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी बदल प्रस्तावित करण्याचे अधिकार सदर समितीस राहतील.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce2636 8b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.05.08 15:45:38 +05'30'

**( वि. का. चौधरी)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन